**शासकीय विभागीय ग्रंथालय, रत्नागिरी या कार्यालयाच्या इमारतीच्या अंतर्गत दुरुस्ती, नुतनीकरण, सुशोभीकरण व आधुनिकीकरण करणे यासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च आणि तंत्र शिक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक- मराग्रं-२०२४/प्र.क्र.१६/ग्रं.क.,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २७ जून, २०२४.

**वाचा:**

१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.बैठक-२०२०/प्र.क्र.८०/२०२०/ साशि-५, दि.०७.१०.२०२१.
२) शासन ज्ञापन, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.पुरक-२०२१/प्र.क्र.१५४/साशि-५, दि.१५.०२.२०२२,
३) शासन ज्ञापन, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.मराग्रं-२०२२/प्र.क्र.१४६/साशि-५, दि.०९.१२.२०२२,
४) शासन ज्ञापन, सा.बां.वि क्र.अनिवि-२०२३/प्र.क्र.३८/अर्थ-२, दि.२६.१०.२०२३,
५) शासन ज्ञापन, सा.बां.वि क्र.अनिवि-२०२३/प्र.क्र.३८/अर्थ-२, दि.१६.०२.२०२४,

लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांच्या स्मृती शताब्दी उपक्रमातर्गत शासकीय विभागीय ग्रंथालय, रत्नागिरी या कार्यालयाच्या इमारतीच्या अंतर्गत दुरुस्ती, नुतनीकरण, सुशोभिकरण य आधुनिकीकरण करणे या कामासाठी संदर्भाधिन १ येथील दि.०७.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.४,२५,००,६२६/- (अक्षरी रुपये चार कोटी पंचवीस लाख सहाशे सव्वीस फक्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. सदर कामासाठी संदर्भाधिन क्र.२ येथील दि.१५.०२.२०२२ रोजीच्या ज्ञापनान्वये रु. ८६,९६,००० (अक्षरी रुपये श्याऐंशी लाख श्याहान्नव हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यात आला. त्यानंतर, संदर्भाधिन क्र. ३ येथील दि.०९.१२.२०२२ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये सदर कामासाठी रु.१,९५,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी पंचाण्णव लाख फ़क्त) इतका निधी वितरीत करण्यात आला. याशिवाय, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन क्र. ४ येथील ज्ञापनान्वये रु.१,१३,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी तेरा लक्ष फक्त) इतका तर संदर्भाधीन क्र. ५ येथील ज्ञापनान्वये रु.२६,१३,०००/- (अक्षरी रुपये सव्वीस लक्ष तेरा हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

**०२.** अशाप्रकारे शासकीय विभागीय ग्रंथालय, रत्नागिरी या कार्यालयाच्या इमारतीच्या अंतर्गत दुरुस्ती, नुतनीकरण, सुशोभीकरण व आधुनिकीकरण करणे या कामास आतापर्यत रु.४,२१,०९,०००/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. त्यानुसार, संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या निधीपैकी आता, उर्वरित रु.३,९१,०००/- (अक्षरी रुपये

तीन लक्ष एक्यान्नव हजार फक्त) निधी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :

**०३. अटी व शर्ती :-**

१) सार्वजनिक बांधकाम विभागाने विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन सदर निधी वितरीत करावा. निधी वितरणाबाबत वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या परिपत्रकांतील सूचनाचे पालन करावे.

२) संबंधित कार्यकारी अभियंता यांनी कामाची प्रगती व झालेला खर्च याचा अहवाल सबंधित कार्यालय प्रमुखांकडे सादर करावा.

३) सदरहू बांधकामावर होणारा खर्च मागणी क्र. एच-८, ४२०२, शिक्षण, क्रिडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च ०४, कला व संस्कृती, १०५, सार्वजनिक ग्रंथालये, (००) (००) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२०२ ०४८२) ५३-मोठी बांधकामे या लेखाशिर्षातर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर निधीतून भागविण्यात यावा.

**०४.** सदर शासन ज्ञापन नियोजन व वित्त विभागाच्या विभागाच्या (अनौपचारीक संदर्भ क्र ६३८/ व्यय-५. दि.०७.०६.२०२४ अन्वये) प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२४०६२७११४६२८७७०८ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2024.06.27 17:18:49 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (वित्त/नियोजन विभाग) मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (सा.बां.वि) मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (उ.व.तं.शि.) मंत्रालय, मुंबई
४. अवर सचिव, (अर्थसंकल्प कक्ष), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. कक्ष अधिकारी (अर्थ-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
७. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. ग्रंथपाल, शासकीय विभागीय ग्रंथालय, रत्नागिरी. (ग्रंथालय संचालनालयामार्फत)
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी (ग्रंथालय संचालनालयामार्फत)
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
११.निवडनस्ती (ग्रं.क.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.